राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेंतर्गत सन २०२२-२३ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी तिस-या हप्त्याचा केंद्र हिश्याचा रु.७४८.६० लक्ष व राज्य हिश्याचा रु.४९९.०७ लक्ष निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६६/३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०२३

वाचा -

१. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२/२०२२-अेई(ई-१०६६७१), विस्तार कक्ष, दि.२५.०३.२०२२
२. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२/२०२२-अेई, विस्तार कक्ष, दि.०७.०४.२०२२
३. आयुक्त(कृषि), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/SEWP २०२२-२३/मंजुरी/२८०/२२, दि.२८.०४.२०२२
४. अवर सचिव(१४-अे),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.RKV-२०२२/C.R.१०३ /१४-A, दि.०३.०६.२०२२
५. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.७१/३-अे, दि.२५/०७/२०२२
६. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/,विस्तार कक्ष, दि.१२.०८.२०२२
७. संचालक(आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.०१/लेखा/पुराही/४८८/२२, दि.१७.०८.२०२२
८. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६६/३-अे, दि.१८/०८/२०२२
९. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई, विस्तार कक्ष, दि.२४.०८.२०२२
१०. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६६/३-अे, दि.१२/०९/२०२२
११. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई, विस्तार कक्ष, दि.१५.११.२०२२
१२. संचालक(आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.०१/लेखा/पुराही/६१९/२२, दि.१६.११.२०२२
१३. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६६/३-अे, दि.२८/११/२०२२
१४. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई, विस्तार कक्ष, दि.२७.०२.२०२३
१५. आयुक्त(कृषि) यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.०१/लेखा/पुराही/१६४/२३, दि.०१.०३.२०२३

**प्रस्तावना –**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. २५.०३.२०२२ व दि. ०७.०४.२०२२ पत्रांन्वये दिलेल्या सुचनांस अनुसरुन सदर योजनेचा एकूण रु. १५३१८.१९ लक्ष रकमेचा राज्य कृति विस्तार आराखडा (SEWP) कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि. २८.०४.२०२२ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेस्तव सादर केला होता. आत्मा योजनेच्या सदर रु. १५३१८.१९ लक्ष रकमेच्या आराखड्यास राज्य प्रकल्प मंजूरी समितीने (SLSC) दि.०५.०७.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिली असुन त्यानुसार सदर आराखड्यास विभागाकडून दि. २२.०८.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

संदर्भाधीन दि. २७.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने सन २०२२-२३ करिता आत्मा योजने अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा तिस-या हप्त्याचा **रु. ७४८.६० लक्ष** निधी वितरीत केला आहे, त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा एकूण **रु. ४९९.०७ लक्ष** निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक(आत्मा) यांनी दि. ०१.०३.२०२३ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

आत्मा अंतर्गत सन २०२२-२३ या अर्थिक वर्षात सर्वसाधारण प्रवर्गाकरिता अर्थसंकल्पित लेखाशीर्ष २४०१ ४४४५ अंतर्गत केंद्र हिश्श्याकरिता रु.४०००.०० लक्ष व लेखाशीर्ष २४०१ ४४३६ अंतर्गत राज्य हिश्श्याकरिता रु.२६६६.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. (आत्मा) या योजने अंतर्गत सन २०२२-२३ करिता पहिल्या व दुस-या हप्त्याचा निधी आयुक्त(कृषि) यांना वितरीत करण्यात आला आहे.

संचालक (आत्मा) यांनी संदर्भाधीन दि. ०१.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन, सन २०२२-२३ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान (आत्मा) या योजने अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी तिस-या हप्त्याचा केंद्र हिस्सा **रु.७४८.६० लक्ष** व राज्य हिस्सा **रु.४९९.०७ लक्ष** असा एकूण **रु. १२४७.६७ लक्ष** इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०२२-२३ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण

प्रवर्गासाठी तिस-या हप्त्याचा केंद्र हिश्श्याचा रू. ७४८.६० लक्ष (रुपये सात कोटी अठ्ठेचाळीस लक्ष साठ हजार फक्त) निधी व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु. ४९९.०७ लक्ष (रुपये चार कोटी नव्व्याणव लक्ष सात हजार फक्त) असा एकूण रु. १२४७.६७ लक्ष (रुपये बारा कोटी सत्तेचाळीस लक्ष सदुसष्ठ हजार फक्त) इतका निधी चालू वर्षी आयुक्त(कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रू. ७४८.६० लक्ष (रुपये सात कोटी अठ्ठेचाळीस लक्ष साठ हजार फक्त) खर्च चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**अ) मागणी क्रमांक डी-३, २४०१ पीक संवर्धन,१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार, (०१) (४४) - कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान ( केंद्र पुरस्कत योजना)**
**(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ ४४४५), ३३ अर्थसहाय्य**

३. तसेच केंद्र हिश्श्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु. ४९९.०७ लक्ष (रुपये चार कोटी नव्व्याणव लक्ष सात हजार फक्त) खर्च चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**ब) मागणी क्रमांक डी-३, २४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार, (०१) (४३) - कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान ( केंद्र पुरस्कत योजना)**
**(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ ४४३६), ३३ अर्थसहाय्य**

४. आत्मा योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी.

५. आयुक्त (कृषि) यांनी या योजनेसाठी केंद्र शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन योजनेंतर्गत उद्दिष्ट निहाय अंमलबजावणीच्या सविस्तर सूचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात, त्यामध्ये पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्यात.

६. लाभार्थी निवडताना अत्यल्प व अल्प भू-धारक, महिला शेतकरी व मागासवर्गीय शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

७. या कार्यक्रमाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन (Third Party Evaluation) करून घ्यावे.

८. सन २०२२-२३ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/ पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच, ती यादी कृषि विभागाच्या वेबसाईटवर देखील प्रदर्शित करावी.

९. सन २०२२-२३ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

१०. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस प्रणालीव्दारे वितरीत करावा.

११. सदर योजनेंतर्गत सन २०२२-२३ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-६२/२०२३/व्यय/१, दिनांक १६.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१७३९१८६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.16 17:47:07 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे
४. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, पुणे
५. सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
६. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
९. संचालक वनामती, नागपूर

१०.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
११.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१२.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१३.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१८.वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१९.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२०.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.निवड नस्ती (कार्यासन-३अे).